**महाराष्ट्र राज्यातील सर्व परीक्षा मंडळांचे अभ्यासक्रम असलेल्या, सर्व माध्यमांच्या शासकीय व खाजगी व्यवस्थापनाच्या सर्व शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्ययन सक्तीचे करणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण २०१९/प्रक्र.७८/एसडी ४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०००३२
दिनांक १ जून २०२०.

**वाचा :**

१. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : सुप्राअ/२००६/(१६४/०६)/प्राशि-५, दि. ४ फेब्रुवारी २००९.
२. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : नाहप्र२००९/(६६३/०९)/माशि-१, दि. ०७ ऑगस्ट २००९.
३. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक : नाहप्र२००९/(६६३/०९)/माशि-१, दि. २० जून २०१२.
४. शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:पीआरई १२१२/ (६/१२)/प्राशि-५, दि. २० जून २०१२.
५. महाराष्ट्र राज्यातील सर्व शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्ययन सक्तीचे करण्यासाठी आणि तत्संबंधी किंवा तदनुषंगिक बाबींसाठी तरतूद करण्याकरिता अधिनियम : सन २०२० महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३,दि. ९ मार्च २०२०.
६. अधिसूचना, मराठी भाषा विभाग "महाराष्ट्र राज्यातील शाळांमध्ये मराठी भाषेचे सक्तीचे अध्यापन व अध्ययन अधिनियम २०२०. ची अंमलबजावणी करण्याबाबतची अधिसूचना दिनांक १६ मार्च २०२०.

**प्रस्तावना :**

समृद्ध वारसा लाभलेल्या विविध भारतीय भाषांचा विकास करणे, हे भाषिक तत्त्वावरील राज्यांची पुनर्रचना करण्यामागचे मुलभूत तत्त्वज्ञान आहे. भाषिक तत्त्वानुसार मराठी भाषा ही महाराष्ट्र राज्याची राजभाषा असून (महाराष्ट्र राजभाषा अधिनियम १९६४) ती एक प्राचीन विकसित भाषा आहे. मराठी भाषेने राज्याला सांस्कृतिक, सामाजिक ओळख निर्माण करून दिली असून त्या भाषेचे जतन व विकास करण्यासाठी राज्य वचनबद्ध आहे. त्यादृष्टीने राज्य शासनाने राज्यातील सर्व माध्यमाच्या व सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये किमान इयता ८ वी पर्यंत मराठी भाषा अध्यापन व अध्ययन सक्तीचे व्हावे या दिशेने मराठी भाषा सक्तीची करण्याबाबत स्वतंत्र उल्लेख असलेले शासन निर्णय निर्गमित केले होते. याचबरोबर राज्यामध्ये केंद्र शासन कार्यालये, राज्य शासन कार्यालये, न्यायालयीन कामकाज व दैनंदीन

व्यवहार यामध्ये मराठी भाषेचा वापर करण्याबाबतही शासन निर्णय निर्गमित केले आहेत. सदर शासन निर्णयांची अंमलबजावणी राज्यात सुरू आहे.

सद्यस्थितीत राज्यामध्ये इयत्ता पहीली ते दहावीचा (प्राथमिक, उच्च प्राथमिक व माध्यमिक शालेय स्तर) विचार करता राज्य परीक्षा मंडळाच्या अभ्यासक्रमाच्या सर्व शाळांमध्ये मराठी विषय **सक्तीचा विषय** स्वरूपातच **लागू** होत आहे. तथापि सी.बी.एस.ई, आय.सी.एस.ई., आय.बी. तसेच केंब्रीज यांसारख्या अन्य मंडळांचे अभ्यासक्रम राष्ट्रीय-आंतरराष्ट्रीय स्तरावर तयार केले गेले असल्याने या सर्व मंडळांच्या, भाषा विषय योजनेमध्ये द्वितीय अथवा तृतीय भाषा म्हणून मराठी भाषा विषय घेण्याचा विकल्प विद्यार्थ्यांना उपलब्ध असतो. बऱ्याच शाळा/विद्यालयांमध्ये मराठी विषय अध्ययन-अध्यापनामध्ये दिला जात नाही . त्यामुळे या शाळा/ विद्यालये यांच्या संदर्भात अध्ययन व अध्यापनामध्ये मराठी विषय **सक्तीचा** नसल्याचे दिसून येते. मराठी माध्यमाव्यतिरिक्त इतर माध्यम व अन्य व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये मराठीखेरीज अन्य भाषा शिकण्याचे विविध पर्याय उपलब्ध असल्यामुळे मराठी भाषा **सक्तीच्या** स्वरूपात अध्ययन व अध्यापनामध्ये राबविण्याबाबत दुर्लक्ष झाले असल्याचे दिसून आले आहे. केंद्रीय तसेच आंतरराष्ट्रीय पातळीवरील या मंडळांची विषय योजना ही त्या त्या मंडळांच्या कार्यक्षेत्रातील बाब असल्यामुळे देखील मराठी भाषेच्या अध्यापन व अध्ययनासंदर्भाने मराठी विषय **सक्तीचा** नव्हता. अशीच काही स्थिती राज्य परीक्षा मंडळाच्या अन्य माध्यमांच्या शाळांमध्येही दिसून येते. उदा.:- सिंधी, गुजराती, उर्दू, कन्नड, तेलुगु, तमिळ व बंगाली. या दृष्टीने विचार करून देशातील तामिळनाडू, तेलंगणा, केरळ व कर्नाटक या राज्यांच्या धर्तीवर महाराष्ट्र शासनाने दि. ९ मार्च २०२० रोजीच्या अधिसूचनेनुसार राज्यातील सर्व माध्यमांच्या, सर्व व्यवस्थापनाच्या शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्ययन सक्तीचे करण्याबाबतचा अधिनियम लागू करण्यात आला. सदर अधिनियमाची अंमलबजावणी दिनांक १ एप्रिल २०२० पासून करण्याचे संदर्भाधीन क्रमांक ६ येथील दिनांक १६ मार्च,२०२० च्या अधिसूचनेनुसार करण्यात आली आहे.या अधिनियमान्वये महाराष्ट्र राज्यात राज्यातील सर्व शाळांमध्ये अध्यापन व अध्ययनामध्ये मराठी भाषा सक्तीची करण्यात आली आहे. त्यानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

**शासन निर्णय :**

महाराष्ट्र शासनाच्या प्रचलित भाषा सूत्रानुसार व महाराष्ट्र राज्यातील सर्व शाळांमध्ये मराठी भाषेचे अध्यापन व अध्ययन सक्तीचे करण्यासाठी आणि तत्संबंधी किंवा तदनुषंगिक बाबींसाठी तरतूद करण्याकरिता अधिनियम, सन २०२०: महाराष्ट्र अधिनियम क्रमांक ३, दि. ९ मार्च २०२० आणि अधिसूचना, मराठी भाषा विभाग -राज्यातील शाळांमध्ये मराठी भाषेचे सक्तीचे अध्यापन व अध्ययन अधिनियम २०२० दिनांक १६ मार्च २०२० निर्गमित केले आहेत. त्यानुसार राज्यातील सर्व माध्यमाच्या शाळांमध्ये मातृभाषेतून शिक्षण देण्याच्या धोरणास बाधा न येवू देता, इतर माध्यमांच्या विद्यार्थ्यांचा अध्ययन स्तर , भाषेची काठिण्य पातळी आणि

याचबरोबर केंद्र शासनाच्या त्रिभाषा सूत्राचा अवलंब करून ,शालेय वर्ष २०२०-२०२१ पासून, इयत्ता पहिली ते दहावी साठी टप्प्याटप्प्याने मराठी भाषा अध्यापन व अध्ययन सक्तीचे करण्यासाठी, खालीलप्रमाणे निर्देश देण्यात येत आहेत.

१. सदर अधिनियम अंमलात आल्यामुळे मराठी भाषा सक्तीबाबतचे यापूर्वीचे सर्व आदेश अधिक्रमित करण्यात येत आहेत.
२. राज्यातील सर्व माध्यमांच्या राज्य परीक्षा मंडळाचा अभ्यासक्रम राबविणाऱ्या मराठी, इंग्रजी व इतर माध्यमांच्या शासकीय, अनुदानित व खाजगी मान्यताप्राप्त शाळा आणि केंद्रीय व इतर मंडळांचे म्हणजेच केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ (सी.बी.एस.ई.), भारतीय माध्यमिक शिक्षण परिषद (आय.सी.एस.ई.), आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ (आय.बी.) तसेच केंब्रीज व अन्य व्यवस्थापन/मंडळांचे अभ्यासक्रम असलेल्या खाजगी/केंद्रीय शाळांमध्ये इयत्ता पहीली ते इयत्ता दहावीसाठी अध्यापन व अध्ययनामध्ये मराठी विषय सक्तीचा राहील. तसेच त्यानुसार मराठी विषय सक्तीचे स्वरुपात अध्ययन व अध्यापनासंबंधी सर्व सोयी सुविधा उपलब्ध करून देण्याची जबाबदारी संबंधित सर्व व्यवस्थापनाची/ मंडळांची राहील.
३. राज्य सरकारच्या प्रचलित अभ्यासक्रम व विषय योजना अंमलबजावणीनुसार राज्यातील सर्व माध्यमांच्या सर्व व्यवस्थापनांच्या राज्य अभ्यासक्रम राबवित असलेल्या मराठी, इंग्रजी व इतर माध्यमांच्या शासकीय, अनुदानित व खाजगी अशा सर्व मान्यताप्राप्त शाळांमध्ये ही अंमलबजावणी सुरू राहील. सर्व माध्यमांसाठी मराठी विषय सक्तीचा राहील.
४. राष्ट्रीय अभ्यासक्रम आराखडा २००५, बालकांचा मोफत व सक्तीच्या शिक्षणाचा अधिनियम २००९, महाराष्ट्र राज्य अभ्यासक्रम आराखडा २०१० व प्राथमिक शिक्षण अभ्यासक्रम २०१२ ची अंमलबजावणी करताना भाषा विषय योजना निश्चित करून राज्यामध्ये मराठी भाषा सर्व माध्यमांना सक्तीची करण्यात आलेली आहे. याचबरोबर माध्यमिक शिक्षण अभ्यासक्रम २०१२ नुसार,महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाच्या इयत्ता नववी व दहावीच्या माध्यमनिहाय भाषा विषय योजनेनुसार राज्यातील मराठी आणि अमराठी शाळांमधील इयत्ता नववी व दहावीच्या वर्गांना मराठी विषय सक्तीचे आहे. भाषा विषय योजनेनुसार इयत्ता पहिली ते दहावीसाठी मराठी विषयाचा अभ्यासक्रम हा प्रथम भाषा, द्वितीय भाषा संपूर्ण किंवा संयुक्त, तृतीय भाषा संपूर्ण किंवा संयुक्त अशा स्वरूपात विषयाची काठिण्यपातळी विचारात घेऊन तयार केला आहे. भाषा विषयाची मांडणी करताना केंद्र शासनाच्या त्रिभाषा सूत्राचा अवलंब करण्यात आला आहे. सदर विषय योजनेप्रमाणे सद्यस्थितीत सुरू असलेली अंमलबजावणी कायम राहील. त्यानुसार मराठी भाषा अभासक्रम व त्यानुसार पाठ्यपुस्तक मंडळामार्फत तयार करण्यात आलेल्या पाठ्यपुस्तकांचे निर्धारण कायम राहील.

५. ज्या मंडळांमार्फत सध्या मराठी विषयाचे अध्यापन/अध्ययन करण्यात येत नाही त्या मंडळांच्या शाळांमध्ये शालेय वर्ष २०२०-२०२१ पासून इयत्ता पहिली व इयत्ता सहावी या इयत्तांसाठी मराठी भाषा हा सक्तीचा विषय म्हणून सुरु करण्यात येईल व त्यानंतर प्रत्येक वर्षी तो पुढील वर्गांना खालीलप्रमाणे लागू करण्यात येईल.

| **इयत्ता पहिली ते पाचवी** | | | **इयत्ता सहावी ते दहावी** | | |
|---|---|---|---|---|---|
| **अ.क्र** | **इयत्ता** | **शैक्षणिक वर्ष** | **अ.क्र** | **इयत्ता** | **शैक्षणिक वर्ष** |
| १ | पहिली | २०२०-२०२१ | १ | सहावी | २०२०-२०२१ |
| २ | दुसरी | २०२१-२०२२ | २ | सातवी | २०२१-२०२२ |
| ३ | तिसरी | २०२२-२०२३ | ३ | आठवी | २०२२-२०२३ |
| ४ | चौथी | २०२३-२०२४ | ४ | नववी | २०२३-२०२४ |
| ५ | पाचवी | २०२४-२०२५ | ५ | दहावी | २०२४-२०२५ |

६. राज्यातील सर्व माध्यमांच्या राज्य अभ्यासक्रमाच्या शाळांमध्ये अभ्यासक्रमानुसार इयत्तानिहाय प्रचलित मराठी भाषा विषय योजना, मूल्यमापन योजना, तासिका विभागणी इत्यादी बाबी प्रचलित पद्धतीनुसार कायम राहतील. तथापि अधिसूचनेची अंमलबजावणी करताना शालेय वर्ष २०२०-२०२१ राज्यातील सर्व अमराठी माध्यमांच्या राज्य अभ्यसक्रमाच्या शाळांमध्ये इयत्ता पहिलीसाठी व इयत्ता सहावी या इयत्तांना मराठी भाषा सक्तीची करताना इतर इयत्तांना टप्प्याटप्प्याने राज्य शासनाचा प्रचलित मराठी भाषा अभ्यासक्रम व त्यानुसार राज्य शासनाने निर्धारित केलेले पाठ्यपुस्तक खालीलप्रमाणे निर्धारीत करण्यात येत आहे. आगामी काळात नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण २०१९ व त्यावर आधारित राज्य अभ्यासक्रम आराखड्यानुसार "**परिशिष्ट अ"** नुसार अभ्यासक्रम व विषय योजनेमध्ये मराठी विषय हा राज्यातील सर्व व्यवस्थापनांच्या सर्व अमराठी माध्यमांसाठी/ शाळांसाठी सक्तीचा राहील. **(सोबत – परिशिष्ट अ)**

७. शालेय स्तरानुसार राज्यातील केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ (सी.बी.एस.ई.), भारतीय माध्यमिक शिक्षण परिषद (आय.सी.एस.ई.), आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ (आय.बी.) तसेच केंब्रीज व अन्य मंडळांचे अभ्यासक्रम असलेल्या खाजगी/केंद्रीय शाळांमध्ये इयत्ता पहिली ते दहावी या इयत्तांसाठी अध्यापन व अध्ययनामध्ये मराठी विषय सक्तीचा राहील. त्यानुसार शालेय वर्ष २०२०-२०२१ पासून "**परिशिष्ट ब**" नुसार अभ्यासक्रम इयत्ता पहिली व सहावी या साठी क्रमश: अंमलबजावणी करावयाची आहे. **(सोबत – परिशिष्ट ब)**

८. राज्यातील राज्य शासनाच्या मराठी माध्यमाव्यतिरीक्त इतर सर्व माध्यमांच्या शाळांमध्ये इयत्ता पहिलीसाठी व इयत्ता सहावीसाठी मराठी भाषा सक्तीचा करताना राज्य शासनाच्या प्रचलित मराठी भाषा अभ्यासक्रमांनुसार मूल्यमापन योजना, तासिका विभागणी इत्यादी बाबी प्रचलित पद्धतीनुसार

कायम राहतील. आगामी काळात लागू करण्यात येणाऱ्या नवीन राष्ट्रीय शैक्षणिक धोरण २०१९ व त्यावर आधारित राज्य अभ्यासक्रम आराखड्यानुसार अभ्यासक्रम व विषय योजनेमध्ये मराठी विषय सर्व अमराठी माध्यमांसाठी सक्तीचा राहील. तेव्हा विषय योजना , तासिका विभागणी व मराठी विषयाचे मुल्यांकन सर्व शाळांमध्ये करण्यात येईल व तशी योजना संबंधित यंत्रणेकडून नव्याने निश्चित करून देण्यात येईल.

९. इयत्ता पहिली ते पाचवी साठी मराठी भाषेच्या अनुषंगाने विद्यार्थ्यांमध्ये प्रामुख्याने श्रवण, भाषण, वाचन, लेखन व संभाषण या कौशल्यांच्या रुजवणूकीसाठी विद्यार्थ्यांच्या अध्ययन स्तरानुसार प्रयत्न करावेत. इयत्ता सहावी ते दहावी या स्तरासाठी स्व-अभिव्यक्ती (स्व-मत प्रकटीकरण), रसग्रहण, उपयोजन अशा विविध उच्चस्तरीय कौशल्यांच्या रुजवणूकीसाठी विशेष प्रयत्न करण्यात यावेत ज्यातून विद्यार्थ्यांमध्ये भाषेविषयी अभिरूची निर्माण होऊन अभिव्यक्ती विकास होईल.

१०.आवश्यकतेनुसार मराठी भाषा विषय अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तक संदर्भात प्रशिक्षण देण्यात येईल. इयत्ता पहिली ते दहावी या स्तरासाठी भाषा विषय योजना, अभ्यासक्रम व प्रशिक्षण याबाबत धोरण ठरविण्याची जबाबदारी राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील. तर यासंदर्भाने पाठ्यपपुस्तक व इतर अध्ययन साहित्य (शिक्षक हस्तपुस्तिका, कार्यपुस्तिका इत्यादी) तयार करण्याची जबाबदारी महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ यांची राहील. इयत्ता नववी व दहावीच्या संदर्भाने मराठी विषयाची मूल्यमापन योजना, प्रश्नपत्रिका आराखडे, परीक्षा पद्धती या सर्वांच्या संदर्भाने देण्यात येणारे प्रशिक्षण इत्यादीची जबाबदारी महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळाची राहील.

११.परदेशातून आलेल्या (पालकांची बदली, स्थलांतर व इतर अनुषंगिक कारणे) आणि अपवादात्मक परिस्थितीमध्ये राज्य अभ्यासक्रमास प्रवेश घेवू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना मराठी भाषा अधिनियम २०२० कलम ११ नुसार मराठी विषयामध्ये अंशत: किंवा संपूर्ण सूट देण्याची तरतूद करण्यात आलेली आहे. या बाबतीत अशा विद्यार्थ्यांना त्यांची मराठी भाषा अध्ययन क्षमता आणि मराठी भाषेचे मुलभूत ज्ञान यानुसार अनुषंगिक बाबींवर निर्णय घेवून कार्यवाही करण्यासाठी संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य यांचे अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्यात येईल. त्यामध्ये राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, पुणे, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे, आणि महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, (बालभारती), पुणे मधील अभ्यासक्रम, मूल्यमापन या संदर्भात काम करणारे अधिकारी/तज्ञ यांचा, सदर समितीमध्ये सदस्य म्हणून समावेश असेल. इतर राज्यातून आलेल्या आणि राज्य अभ्यासक्रमाच्या कोणत्याही माध्यमात प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना सूट राहणार नाही. तथापि अपवादात्मक परिस्थितीमध्ये निर्णय

घेणेसंदर्भात ऑनलाईन प्रणाली विकसित करून त्याआधारे कार्यवाही करण्याची जबाबदारी ही राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

१२.इतर राज्यांमधून आलेल्या विद्यार्थ्यांनी राज्य अभ्यासक्रमास प्रवेश घेवू इच्छिणाऱ्या विद्यार्थ्यांना कोणत्याही परिस्थितीत सूट मिळणार नाही. फक्त अपवदात्मक परिस्थितीत (पालकांची बदली, स्थलांतर व इतर अपरिहार्य परिस्थिती) प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांना - परिशिष्ट अ॰ मधील विश्लेषणानुसार माध्यमनिहाय ज्या इयत्तेमध्ये प्रवेश घेतला असेल त्याआधीच्या स्तरावरील सुरूवातीचा भाषा विषय अभ्यासक्रम टप्प्याटप्प्याने पूर्ण करावा लागेल . याबाबतची सर्व जबाबदारी संबंधित विद्यार्थी व शाळेची असेल. त्यानुसार शाळेने अध्यायन व अध्यापनाची सोय उपलब्ध करून देणे आवश्यक आहे.

१३.राज्यामध्ये शालेय वर्ष २०२०-२१ पासून सदर शासन निर्णयाची प्रभावी व काटेकोरपणे अंमलबजावणी करण्याची जबाबदारी संबंधित सर्व यंत्रणा/संस्था/कार्यालये/मंडळे/शाळा यांची राहील.

१४.सदर शासन निर्णयातील निदेशाचे पालन न केल्यास संबंधित यंत्रणा/संस्था/कार्यालये/मंडळे/शाळा यांचेविरुध्द प्राप्त तक्रारीच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यासाठी संबंधित शिक्षण उपसंचालक, हे “सक्षम प्राधिकारी” राहतील व शिक्षण संचालक (प्राथमिक) /शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) हे “अपिलीय अधिकारी” राहतील. त्यांनी संबंधित संस्था/कार्यालये/मंडळे/शाळा अधिनियमातील तरतूदीनुसार कारवाई करावी.

१५.सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२००६०५१४४६२५५८२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्र राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra
Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.06.05 17:36:48 +05'30'

**(राजेंद्र पवार)**
**उपसचिव महाराष्ट्र शासन**

प्रत :

१. आयुक्त (शिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे

२. राज्य प्रकल्प संचालक, महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद, मुंबई

३. संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य
४. संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र, पुणे
५. शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), शिक्षण संचालनालय , पुणे
६. शिक्षण संचालक (प्राथमिक), शिक्षण संचालनालय , पुणे
७. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ, पुणे
८. संचालक, महाराष्ट्र राज्य पाठ्यपुस्तक निर्मिती व अभ्यासक्रम संशोधन मंडळ, बालभारती, पुणे
९. अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य परीक्षा परिषद, पुणे
१०.सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक
११.मुख्य अधिकारी सर्व (द्वारा संबंधित जिल्हा शिक्षणाधिकारी (प्राथमिक/ माध्यमिक व उच्च माध्यमिक)
१२.प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (सर्व)
१३.शिक्षणाधिकारी सर्व (प्राथमिक/माध्यमिक) जिल्हा परिषद
१४.शिक्षणाधिकारी, बृहन्मुंबई महानगरपालिका, मुंबई
१५.शिक्षण निरीक्षक , बृहन्मुंबई (पश्चिम, उत्तर, दक्षिण)
१६.अध्यक्ष/सचिव, सी.बी.एस.ई.
१७. अध्यक्ष/सचिव, आय.सी.एस.ई.
१८. अध्यक्ष/सचिव, आय.बी.
१९.अध्यक्ष/सचिव, केंब्रीज
२०.खाजगी सचिव, मा. मंत्री, मराठी भाषा, मुंबई
२१.खाजगी सचिव, मा. मंत्री, शालेय शिक्षण, मंत्रालय, मुंबई
२२.खाजगी सचिव , मा. राज्यमंत्री, शालेय शिक्षण मंत्रालय, मुंबई
२३.सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
२४.प्रसिद्धी अधिकारी, शालेय शिक्षण, माहिती व जनसंपर्क विभाग, मंत्रालय, मुंबई
२५.सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मंत्रालय, मुंबई
२६.निवड नस्ती, कार्यासन प्राशि -४

## परिशिष्ट अ

राज्य शासनाच्या राज्य अभ्यासक्रमाच्या सर्व माध्यमाच्या शाळासाठी शालेय वर्ष २०२०-२०२१ पासून राज्यातील राज्य अभ्यसक्रमाच्या सर्व अमराठी माध्यमांच्या शाळांमध्ये इयत्ता पहिलीसाठी व इयत्ता सहावी या इयत्तांना मराठी भाषा सक्तीचे करताना इतर इयत्तांना टप्प्याटप्प्याने राज्य शासनाचा मराठी भाषा अभ्यासक्रम व त्यानुसार राज्य शासनाने निर्धारित केलेली पाठयपुस्तके खालीलप्रमाणे राहतील.

| इयत्ता स्तर | माध्यम | विषय | मराठी विषय पाठ्यपुस्तक |
|---|---|---|---|
| १ ली व २ री | **मराठी** | १. मराठी<br>२. इंग्रजी (सक्तीचे ) | बालभारती |
| | **इंग्रजी** | १. इंग्रजी<br>२. मराठी (सक्तीचे ) | मजेत शिकूया (चित्रपुस्तिका) |
| | **हिंदी** | १. हिंदी<br>२. मराठी (सक्तीचे )<br>३. इंग्रजी (सक्तीचे ) | मजेत शिकूया (चित्रपुस्तिका) |
| | **इतर माध्यम (गुजराती, उर्दू, कन्नड, सिंधी, तेलगु, तमिळ, बंगाली)** | १. मातृभाषा<br>२. मराठी (सक्तीचे )<br>३. इंग्रजी (सक्तीचे ) | मजेत शिकूया (चित्रपुस्तिका) |
| ३ री व ४ थी | **मराठी** | १. मराठी<br>२. इंग्रजी (सक्तीचे ) | बालभारती |
| | **इंग्रजी** | १. इंग्रजी<br>२. मराठी (सक्तीचे ) | सुलभभारती |
| | **हिंदी** | १. हिंदी<br>२. मराठी (सक्तीचे )<br>३. इंग्रजी (सक्तीचे ) | सुलभभारती |
| | **इतर माध्यम (गुजराती, उर्दू, कन्नड, सिंधी, तेलगु, तमिळ, बंगाली)** | १. मातृभाषा<br>२. मराठी (सक्तीचे )<br>३. इंग्रजी (सक्तीचे ) | सुलभभारती |
| ५ वी | **मराठी** | १. मराठी (प्रथम)<br>२. हिंदी (द्वितीय)<br>३. इंग्रजी (तृतीय) | बालभारती |
| | **इंग्रजी** | १. इंग्रजी (प्रथम)<br>२. मराठी (द्वितीय)<br>३. हिंदी (तृतीय) संपूर्ण स्वरूपात **किंवा** हिंदी व मातृभाषा (संयुक्त स्वरूपात) | सुलभभारती (द्वितीयसाठी) |

| | | | |
|---|---|---|---|
| | **हिंदी** | १. हिंदी (प्रथम)<br>२. मराठी (द्वितीय)<br>३. इंग्रजी (तृतीय) | सुलभभारती<br>(द्वितीयसाठी) |
| | **इतर माध्यम (गुजराती, उर्दू, कन्नड, सिंधी, तेलगु, तमिळ, बंगाली)** | १. मातृभाषा (प्रथम)<br>२. मराठी (द्वितीय) व हिंदी (द्वितीय) संयुक्त स्वरूपात<br>३. इंग्रजी (तृतीय) | सुगमभारती<br>(संयुक्तसाठी ) |
| **६ वी व ७ वी** | **मराठी** | १. मराठी (प्रथम)<br>२. हिंदी (द्वितीय)<br>३. इंग्रजी (तृतीय) | बालभारती |
| | **इंग्रजी** | १. इंग्रजी (प्रथम)<br>२. मराठी (द्वितीय)<br>३. हिंदी (तृतीय) स्वरूपात **किंवा** हिंदी व मातृभाषा (संयुक्त स्वरूपात) | सुलभभारती<br>(द्वितीयसाठी) |
| | **हिंदी** | १. हिंदी (प्रथम)<br>२. मराठी (द्वितीय)<br>३. इंग्रजी (तृतीय) | सुलभभारती<br>(द्वितीयसाठी) |
| | **इतर माध्यम** | १. मातृभाषा (प्रथम)<br>२. मराठी (द्वितीय) व हिंदी (द्वितीय) संयुक्त स्वरूपात<br>३. इंग्रजी (तृतीय) | सुगमभारती<br>(संयुक्तसाठी ) |
| **८ वी** | **मराठी** | १. मराठी (प्रथम)<br>२. इंग्रजी (तृतीय)<br>३. हिंदी (द्वितीय)/संस्कृत/पाली/अर्धमागधी **किंवा** हिंदी व संस्कृत/हिंदी व पाली/हिंदी व अर्धमागधी/ हिंदी व उर्दू/हिंदी व पर्शियन/हिंदी व अरेबिक संयुक्त स्वरूपात **किंवा** उर्दू - पर्शियन / उर्दू अरेबिक | बालभारती |
| | **इंग्रजी** | १. इंग्रजी (प्रथम)<br>२. मराठी (द्वितीय)<br>३. हिंदी (तृतीय) संपूर्ण स्वरूपात **किंवा** हिंदी व संस्कृत/हिंदी व पाली/हिंदी व अर्धमागधी/हिंदी व फ्रेंच/हिंदी व | सुलभभारती<br>(द्वितीयसाठी) |

| | | | |
|---|---|---|---|
| | | जर्मन/हिंदी व रशियन/हिंदी व गुजराती/हिंदी व कन्नड/हिंदी व तमिळ/हिंदी व तेलगु/हिंदी व सिंधी/हिंदी व उर्दू/हिंदी व पर्शियन/हिंदी व अरेबिक/गुजराती/संस्कृत. | |
| | **हिंदी** | १. हिंदी (प्रथम)<br>२. इंग्रजी (तृतीय)<br>३. मराठी (द्वितीय) **किंवा** मराठी व संस्कृत/मराठी व अर्धमागधी/मराठी व पाली/मराठी व फ्रेंच/मराठी व जर्मन/मराठी व रशियन/ मराठी व उर्दू/ मराठी व अरेबिक/मराठी व पर्शियन.<br>**(संयुक्त स्वरूपात)** | सुलभभारती (द्वितीयसाठी) **किंवा** सुगमभारती (संयुक्तसाठी ) |
| | **इतर माध्यम (गुजराती, उर्दू, कन्नड, सिंधी, तेलगु, तमिळ, बंगाली)** | १. मातृभाषा (प्रथम)<br>२. इंग्रजी (तृतीय)<br>३. मराठी (द्वितीय) **किंवा** मराठी व हिंदी/ मराठी व संस्कृत/ मराठी व अर्धमागधी/मराठी व पाली/ मराठी व उर्दू/ मराठी व अरेबिक/मराठी व पर्शियन.<br>**(संयुक्त स्वरूपात )** | सुलभभारती (द्वितीयसाठी) **किंवा** सुगमभारती (संयुक्तसाठी ) |
| ९ वी व १० वी | **मराठी** | १. मराठी (प्रथम)<br>२. हिंदी (द्वितीय)/संयुक्त स्वरूपात इतर भाषा किंवा मातृभाषा विषयासोबत<br>३. इंग्रजी (तृतीय) | कुमारभारती |
| | **इंग्रजी** | १. इंग्रजी (प्रथम)<br>२.मराठी (द्वितीय)<br>३. हिंदी (तृतीय)संपूर्ण स्वरूपात **किंवा** इतर भाषा किंवा मातृभाषा विषयासोबत संयुक्त स्वरूपात | अक्षरभारती (द्वितीयसाठी) |
| | **हिंदी** | १. हिंदी (प्रथम)<br>२.मराठी (द्वितीय) **किंवा** मराठी व संस्कृत/मराठी व अर्धमागधी/मराठी व पाली/मराठी व फ्रेंच/मराठी व जर्मन/मराठी व रशियन/ मराठी व उर्दू/ | अक्षरभारती (द्वितीयसाठी) **किंवा** आंतरभारती (संयुक्तसाठी) |

| | | | |
|---|---|---|---|
| | | मराठी व अरेबिक/मराठी व पर्शियन.<br>**(संयुक्त स्वरूपात )**<br>३. इंग्रजी(तृतीय) | |
| | **इतर माध्यम (गुजराती, उर्दू, कन्नड, सिंधी, तेलगु, तमिळ, बंगाली)** | १. मातृभाषा (प्रथम)<br>२.इंग्रजी (तृतीय)<br>३. मराठी (द्वितीय) **किंवा** मराठी व हिंदी/ मराठी व संस्कृत/ मराठी व अर्धमागधी/मराठी व पाली/ मराठी व उर्दू/ मराठी व अरेबिक/मराठी व पर्शियन.<br>**(संयुक्त स्वरूपात )** | अक्षरभारती (द्वितीयसाठी) **किंवा** आंतरभारती (संयुक्तसाठी ) |

# परिशिष्ट ब

राज्यातील केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ (सी.बी.एस.ई.), भारतीय माध्यमिक शिक्षण परिषद (आय.सी.एस.ई.), आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ (आय.बी.) तसेच केंब्रीज व अन्य मंडळांचे अभ्यासक्रम असलेल्या खाजगी/केंद्रीय अशा सर्व शाळांसाठी शालेय वर्ष २०२०-२०२१ पासून निर्धारित अभ्यासक्रम व पाठयपुस्तके

| इयत्ता | माध्यम व्यवस्थापन | भाषा विषय | अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तक अंमलबजावणी |
|---|---|---|---|
| **पहिली व सहावी** | केंद्रीय माध्यमिक शिक्षण मंडळ (सी.बी.एस.ई.), भारतीय माध्यमिक शिक्षण परिषद (आय.सी.एस.ई), आंतरराष्ट्रीय शिक्षण मंडळ (आय.बी.), केंब्रीज व केंद्रीय अभ्यासक्रम असलेल्या खाजगी शाळा/ केंद्रीय शाळा किंवा अन्य कोणत्याही खाजगी मंडळाच्या/व्यवस्थापना च्या शाळा | १. इंग्रजी<br>२. मराठी (सक्तीचे) संपूर्ण किंवा संयुक्त<br>३. संबंधित मंडळाच्या अभ्यासक्रमानुसार इतर कोणतीही एक भाषा संपूर्ण किंवा संयुक्त स्वरूपात<br>**टिप : भाषा विषय मुद्दा क्र. २ व मुद्दा क्र. ३ ची निश्चिती करताना दोन्ही ठिकाणी संयुक्त भाषा विषय योजना राबवू नये.** | **अ.** यासंदर्भाने मराठी विषयाचे जे अभ्यासक्रम व पाठ्यपुस्तके राज्य शासनामार्फत निर्धारीत करण्यात आलेली आहेत त्यांची निश्चिती खालीलप्रमाणे राहील.<br>१. **इयत्ता पहिली :** मजेत शिकुया -चित्रपुस्तिका॰<br>२. **इयत्ता सहावी :** प्रचलित अभ्यासक्रम व त्यावर आधारीत पाठ्यपुस्तकापैकी कोणत्याही एका पाठ्यपुस्तकाचे निर्धारण करण्यात यावे.<br>अ. मराठी बालभारती (संपूर्णसाठी)<br>आ. मराठी सुलभभारती (संपूर्णसाठी)<br>इ. मराठी सुगमभारती (संयुक्तसाठी)<br>**ब.** भाषा विषय मूल्यमापन योजना संबंधित निश्चिती / कार्यवाही करण्याबबतची जवाबदारी संबांधित मंडळ/व्यवस्थापनाची राहील. |

**टिप :** टप्प्याटप्प्याने पुढील इयत्तांसाठी अंमलबजावणी करताना ‘परिशिष्ट अ’ प्रमाणे कार्यवाही करण्यात यावी. आवश्यकतेनुसार याबाबत सुचना स्वतंत्रपणे शासनामार्फत देण्यात येतील.